राज्यातील साखर कारखान्यांनी दिनांक १ मे १९९१ नंतर गळित केलेल्या उसावरील खरेदी कर माफ करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय क्रमांक : उखक १०९१/प्र.क्र. १२३/कराधान-३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : 24 सप्टेंबर, १९९१.

प्रस्तावना :-

सन १९९०-९१ चा गळित हंगाम चालू असताना राज्यामध्ये उसाचे अमाप पीक झाल्यामुळे अतिरिक्त झालेल्या उसाचे गाळप करण्यासाठी साखर कारखान्यांना त्यांचा नियमित गळित हंगाम वाढवून अतिरिक्त उस गाळप करण्याच्या सूचना देण्यात आल्या होत्या. परंतु हा अतिरिक्त उस वाहतूक करण्यासाठी आणि नियमित हंगाम संपताना साखरेच्या उताऱ्या [यील्ड] मध्ये येणाऱ्या घटीमुळे साखर कारखान्यांना जो आर्थिक तोटा सोसावा लागतो. तो काही प्रमाणात भरुन देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

तदनुसार या प्रश्नाबाबत काळजीपूर्वक विचार झाल्यानंतर मंत्रिमंडळाच्या मान्यतेने उस खरेदी कर माफी बाबत खालील निर्णय घेण्यात आला आहे.

शासन निर्णय :-

राज्यातील साखर कारखान्यांनी सन १९९०-९१ चा नियमित गळित हंगाम वाढवून केलेल्या गळितासाठी दिनांक १ मे १९९१ पासून दिनांक ३१ जुलै १९९१ पर्यंत गाळलेल्या उसावरील, उस खरेदी कर, खालील अटीप्रमाणे संपूर्णपणे माफ करण्यात यावा.

अट :- उसाचे गाळप बंद केल्याची निश्चित तारीख साखर संचालकांनी प्रमाणित केलेली असावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[स्वाक्षरी]
[वि. प्र. कुलकर्णी],
कक्ष अधिकारी.

—२/—

प्रत माहितीसाठी व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी सादर अग्रेषित.

१. विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य आठवा मजला, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई-४०० ०१०.

२. साखर आयुक्त, न्यू.पी.एम.टी. बिल्डींग, पुणे-४११ ०४२.

३. महालेखापाल [लेखा परिक्षा] एक, महाराष्ट्र, मुंबई.

४. अवर सचिव, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

५. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ, साखर भवन, नरिमन पॉईंट, मुंबई.

६. निवड नस्ती, करा-धान-३.